**राज्यातील सर्व शासकिय रुग्णालयात होणाऱ्या अवैध गर्भपात प्रकरणाची चौकशी करण्याकरीता समिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमटीपी-२०१९/१८३/प्र.क्र.४३/कु.क.**

बी विंग, १० मजला, गो.ते.रुग्णालय, संकुल इमारत
लो.टि.मार्ग, मुंबई ४०० ००१.
दिनांक : २८ सप्टेंबर, २०२०

**वाचा -**

1) **सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्रमांकः प्रचिनी-२०१९/१८३/प्र.क्र.४३/कु.क. दि.२९.०८.२०१९**
2) **सार्वजनिक आरोग्य विभाग शासन पुरकपत्र क्रमांकः प्रचिनी-२०१९/१८३/प्र.क्र.४३/कु.क. दि.३१.०८.२०१९**

**प्रस्तावना -**

जिल्हा रुग्णालय नाशिक येथील अवैध गर्भपात प्रकरणाबाबत दि.२.४.२०१७ रोजीच्या वृत्तपत्रात आलेल्या बातमीच्या अनुषंगाने मा.मंत्री महोदय (सार्वजनिक आरोग्य विभाग) यांनी विधानमंडळात निवेदन केले होते. शासकीय रुग्णालयात घडणाऱ्या बेकायदेशीर गर्भपाताच्या घटनांच्या पार्श्वभूमीवर राज्यात वैद्यकिय गर्भपात कायदयाची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी सेवानिवृत्त पोलिस महासंचालक आणि सेवा निवृत्त आरोग्य संचालक यांच्यामार्फत चौकशी करण्याचे आश्वासन दि. ७.४.२०१७ रोजी मा. मंत्री (सार्वजनिक आरोग्य विभाग) यांनी विधानमंडळात दिले आहे.

त्या अनुषंगाने संदर्भिय क्र. १ च्या शासन निर्णयान्वये समिती गठीत करण्यात आली होती.परंतु ही समिती नाशिक जिल्हयापुरतीच सिमित असल्याने राज्यातील इतरत्र घडणाऱ्या घटनांचा तपास करणे शक्य नसल्याने दि. २९.८.२०१९ चा शासन निर्णय अधिक्रमित करुन राज्यात इतरत्र घडणाऱ्या अवैध गर्भपाता प्रकरणांची चौकशी/ तपासणी करण्यासाठी भारतीय पोलीस सेवेतील (IPS) दर्जाचे सेवानिवृत्त पोलीस महासंचालक यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार पुढील प्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय-

राज्यात होणाऱ्या अवैध गर्भपात प्रकरणांची चौकशी करण्याकरीता खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | सदस्याचे नाव | पदनाम | सदस्यत्वाचा प्रकार |
|---|---|---|---|
| १ | श्री.अजित पारसनीस | सेवानिवृत्त पोलिस महासंचालक | अध्यक्ष |
| २. | श्री.सुभाष साळुंखे | सेवानिवृत्त संचालक, आरोग्य सेवा | सदस्य |
| ३. | प्राध्यापक व विभाग प्रमुख स्त्रीरोग व प्रसुतिशास्त्र विभाग, ग्रॅन्ट शासकिय महाविद्यालय व सर जे.जे. रुग्णालय, मुंबई | स्त्रीरोगतज्ञ | सदस्य |
| ४ | सहाय्यक संचालक आरोग्य सेवा | सहाय्यक संचालक, आरोग्य सेवा, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे | सदस्य सचिव |

**समितीची कार्यकक्षा-**

१. राज्यात ज्या ठिकाणी अवैद्य गर्भपाताची घटना घडलेली आहे. त्या घटनांची चौकशी करुन अभिप्राय व अहवाल शासनास सादर करणे.
२. अशा प्रकारे घडण्याच्या घटनांसाठी कारणीभुत असलेल्या त्रुटी शोधणे.
३. अशा घटनांची पुनरावृत्ती टाळण्यासाठी करावयाच्या उपाययोजना सुचविणे.

**समितीचा कार्यकाल-**

सदर समिती घटना घडल्याच्या दिनांकापासुन १ महिन्याच्या कालावधीमध्ये आपला चौकशी अहवाल शासनास सादर करेल. समितीने विहित वेळेत अहवाल सादर करणे अनिवार्य राहील.

**मानधन-**

समिती सदस्यांना कामकाजासाठी दैनिक भत्ता, भाडयाचे वाहन, राहण्याची व्यवस्था अनुज्ञेय असून यावरील खर्च सोनोग्राफी केंद्राच्या नोंदणीमुळे राज्यस्तरावर जमा झालेल्या शुल्कामधुन करण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९२२१३१८००६८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jamsher Samsher Tadavi

Digitally signed by Jamsher Samsher Tadavi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cc70f5be589b29aaa447f5cdd15c9826781de5daa02a4ecf339fb1d0559ab9d6, serialNumber=a92e218ede7b7c9acaa3bea18f6d46feab420783e12f260504f402b54de8c476, cn=Jamsher Samsher Tadavi
Date: 2020.09.28 11:41:27 +05'30'

**(ज. स. तडवी)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. राज्यपाल यांचे खाजगी सचिव, राज्यपाल कार्यालय, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री (आरोग्य व कुटुंब कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. राज्यमंत्री (आरोग्य व कुटुंब कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. सर्व मंत्री /राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
७. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (विधी व न्याय विभाग), मंत्रालय, मुंबई.
१०. आयुक्त , आरोग्य सेवा व संचालक, राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान, मुंबई.
११. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
१२. श्री.अजित पारसनीस, सेवानिवृत्त पोलीस महासंचालक, रा.१४ अवंती, ६ वा मजला, मलबार हिल, मुंबई-४०० ००६.
१३. डॉ.सुभाष साळुंखे, सेवानिवृत्त संचालक, ५०२-कुणाल ओझोन, सिमला ऑफिसच्या मार्ग, शिवाजी नगर, पुणे ४११००५
१४. प्राध्यापक व विभाग प्रमुख, स्त्री रोग व प्रसुती शास्त्र विभाग, ग्रॅन्ड शासकिय महाविद्यालय व सर जे.जे. रुग्णालय, मुंबई.
१५. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे
१६. सहाय्यक संचालक, आरोग्य सेवा, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे
१७. सर्व मंत्रालयीन विभाग,
१८. निवडनस्ती.